राजमाता जिजाऊ शैक्षणिक गुणवत्ता विकास अभियानांतर्गत शासकीय निजामकालीन जुन्या व मोडकळीस आलेल्या शाळांच्या वर्गखोल्या दुरुस्ती व पुनर्बांधणीस प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः-सादिल-२०२१/प्र.क्र.१०१/एसएम-४,**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक:- ९ सप्टेंबर, २०२१

वाचा :- महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद यांचे पत्र क्र. मप्राशिप/सशि/बांध-१०१७/२०२०-२१/ ३०१, दिनांक ०१ फेब्रुवारी, २०२१

**प्रस्तावना:-**

राज्यातील स्थानिक स्वराज्य संस्थेच्या सर्व शाळांचे समग्र शिक्षा यंत्रणेमार्फत Preliminary Structural Audit करण्यात आले आहे.राज्यातील स्थानिक स्वराज्य संस्थेच्या शाळेतील वर्गांची पुनर्बांधणी तसेच शाळांची दुरुस्ती करण्यासाठी राजमाता जिजाऊ शैक्षणिक विकास गुणवत्ता अभियान राबविण्याचे प्रस्तावित असून सदर अभियानांतर्गत प्रथम टप्यात औरंगाबाद विभागातील जिल्हयांमधील निजामकालीन स्थानिक स्वराज्य संस्थांच्या शाळांच्या दुरुस्ती/ नवीन बांधकाम (पुनर्बांधणी) करण्याचे प्रस्तावित आहे. मराठवाडा विभागात मोठ्या प्रमाणात शासकीय निजामकालीन शाळा आहेत. समग्र शिक्षा यंत्रणेमार्फत Preliminary Structural Audit मध्ये मराठवाडा विभागातील शाळांमध्ये मोडकळीस आलेल्या वर्गखोल्यांची पुनर्बांधणी व दुरुस्तीची कामे तातडीने करणे गरजेचे असल्याने प्राधान्याने मराठवाडा विभागातील निजामकालीन शासकीय शाळांचे वर्ग खोल्यांची पुनर्बांधणी तसेच दुरुस्ती करण्याबाबतचा प्रस्ताव महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद यांनी शासनास सादर केला आहे. त्यास अनुसरुन राजमाता जिजाऊ शैक्षणिक गुणवत्ता विकास अभियान अंतर्गत पहिल्या टप्प्यात मराठवाडा विभागातील निजामकालीन शासकीय शाळांचे वर्ग खोल्यांची पुनर्बांधणी तसेच दुरुस्ती करण्यास प्रशासकीय मान्यता देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन आहे.

**शासन निर्णय :-**

राज्यातील स्थानिक स्वराज्य संस्थेच्या शाळेतील वर्गांची पुनर्बांधणी तसेच शाळांची दुरुस्ती करण्यासाठी राजमाता जिजाऊ शैक्षणिक गुणवत्ता विकास अभियान राबविण्यास तसेच पहिल्या टप्यात मराठवाडा विभागातील शाळांमध्ये मोडकळीस आलेल्या ७१८ शाळांमधील १६२३

वर्गखोल्यांची पुनर्बांधणी तसेच, १०५० शाळांच्या दुरुस्तीची कामे करण्यास व त्यासाठी येणाऱ्या रु.२००.०० कोटी ( रुपये दोनशे कोटी फक्त ) इतक्या खर्चास खालील अटी व शर्तीच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे. याबाबतचे जिल्हा निहाय शाळा व वर्गखोल्यांचे सविस्तर विवरणपत्र शासन निर्णयासोबत जोडले आहे.

अ) मराठवाडा विभागातील शाळांमध्ये मोडकळीस आलेल्या शाळांमधील वर्गखोल्यांची पुनर्बांधणी तसेच, शाळांच्या दुरुस्तीसाठी येणाऱ्या खर्चाच्या ८० टक्के इतका निधी शासन स्तरावरुन उपलब्ध करुन देण्यात येईल.

आ) उर्वरित, २० टक्के निधी पैकी, १० टक्के निधी संबंधीत जिल्हा परिषदेने त्यांच्या सेस फंडातून / १५ व्या वित्त आयोग/ जिल्हा नियोजन समिती/ आमदार निधी/ खासदार निधी /मानव विकास मिशन इ. पैकी उपलब्ध तरतूदीमधून व उर्वरीत १० टक्के निधी संबंधीत शाळा व्यवस्थापन समितीने स्थानिक लोकवर्गणीतून किंवा सी.एस.आर. फंडामधून (CSR Fund) रोख किंवा वस्तू ( In kind or in cash ) स्वरुपात उपलब्ध करुन दयावा.

इ) शासनाने उपलब्ध करुन दिलेला निधी, जिल्हा परिषदांनी किमान ६० ते १०० पटसंख्या असलेल्या शाळांपैकी ज्या शाळांनी २० टक्के निधी वरील (अ) प्रमाणे अथवा अन्य स्त्रोतातून उभा केला आहे, त्या शाळांना प्राधान्याने वाटप करावा.

ई) याकरीता, मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांनी २० टक्के निधी वर नमूद स्त्रोताद्वारे उपलब्ध होण्याकरीता नियोजन करणे व त्यानुसार मोहीम राबविणे आवश्यक आहे.

**२.** संबंधित जिल्हयातील प्रस्तावित शाळांच्या वर्गखोल्यांची पुनर्बाधणी व दुरुस्तीची मोहीम राबविण्याची जबाबदारी तसेच, प्राधान्यक्रम ठरविण्याची जबाबदारी मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (संबंधित) यांचेकडे सोपविण्यात येत आहे. या करीता मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (संबंधित) यांचे अध्यक्षतेखाली खालीलप्रमाणे अंमलबजावणी समिती स्थापन करण्यात येत आहे.

| | | |
|---|---|---|
| १. | मुख्य कार्यकारी अधिकारी,<br>संबंधित जिल्हा परिषद | अध्यक्ष |
| २. | उप मुख्य कार्यकारी अधिकारी ( ग्रा.पं.) | सदस्य |
| ३. | संबंधित गावाचे सरपंच | सदस्य |
| ४. | संबंधित शाळाचे मुख्याध्यापक | सदस्य |
| ५. | शाळा व्यवस्थापन समितीमधील एक सदस्य | सदस्य |
| ६. | कार्यकारी अभियंता, जिल्हा परिषद, समग्र<br>शिक्षा अभियान (संबंधित) | सदस्य सचिव |

३. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (संबंधित) यांनी त्यांच्या जिल्ह्यातील मंजूर शाळांच्या खोल्यांची पुनर्बांधणी व दुरुस्तीची कामे विशेष मोहिम राबवून पूर्ण करुन घ्यावीत व त्यासाठी स्थानिक निधी उभारुन आवश्यक प्राधान्यक्रम ठरवावे. तसेच, मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, संबंधित यांनी शाळांच्या खोल्यांची पुनर्बांधणी व दुरुस्तीकामांचा बैठक आयोजित करुन वेळोवेळी आढावा घेण्यात यावा. ज्या जिल्हा परिषदांनी शाळा खोल्यांच्या पुनर्बांधणी व दुरुस्ती संदर्भात उत्तम कामगिरी केली आहे, त्या जिल्हा परिषदेचे (१) अध्यक्ष, (२) मुख्य कार्यकारी अधिकारी, (३) संबंधित गावाचे सरपंच व (४) संबंधित शाळांचे मुख्याध्यापक यांचा शासन स्तरावरुन यथोचित पुरस्कार देऊन सन्मान करण्यात येईल. याबाबतचा शासन निर्णय स्वतंत्रपणे निर्गमित करण्यात येईल.

४. उपरोक्त बाबींवर होणारा खर्च "मागणी क्र. ई-२, २२०२ सर्वसाधारण शिक्षण, ०१-प्राथमिक शिक्षण, १९६, जिल्हा परिषदांना सहाय्य, (०१) प्राथमिक शिक्षणासाठी जिल्हा परिषदांना सहाय्य (०१)(०१) महाराष्ट्र जिल्हा परिषद व पंचायत समिती अधिनियम, १९६१ च्या कलम १८२ अन्वये जिल्हा परिषदांना सप्रयोजन अनुदाने, ३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) (२२०२ ०१७३)" या लेखाशिर्षाखाली उपलब्ध तरतूदीतून भागविण्यात यावा.

५. उपरोक्त शासन निर्णयान्वये मंजूरी दिलेल्या मराठवाडयातील जिल्हयांमधील निजामकालीन शाळांच्या वर्गखोल्यांची पुनर्बांधणी आणि दुरुस्तीकरीता निधीचे आदेश स्वतंत्रपणे निर्गमित करण्यात येतील.

६. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. ७४७/व्यय-५, दिनांक १२.०८.२०२१ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२१०९०९१३३६३४८०२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Imtiyaz Mushtaque Kazi

Digitally signed by Imtiyaz Mushtaque Kazi
DN: CN = Imtiyaz Mushtaque Kazi, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = SCHOOL EDUCATION & SPORT DEPARTMENT
Date: 2021.09.09 13:37:16 +05'30'

**( इ. मु. काझी )**

**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
२) मा. उप मुख्यमंत्री (वित्त व नियोजन) यांचे खाजगी सचिव.
३) मा. मंत्री (शालेय शिक्षण) यांचे खाजगी सचिव

४) मा. राज्यमंत्री (शालेय शिक्षण ) यांचे खाजगी सचिव
५) अपर मुख्य सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई,
६) अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
७) प्रधान सचिव, ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
८) आयुक्त (शिक्षण) महाराष्ट्र राज्य, पुणे,
९) शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक/प्राथमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे-१,
१०) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद(औरंगाबाद/बीड/हिंगोली/ जालना/ लातूर/नांदेड/उस्मानाबाद व परभणी )
११) विभागीय शिक्षण उपसंचालक ( औरंगाबाद व लातूर )
१२) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर,
१३) महालेखापाल (लेखापरिक्षा) महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर,
१४) शिक्षणाधिकारी (प्राथमिक / माध्यमिक ), जिल्हा परिषद (औरंगाबाद/बीड/ हिंगोली/ जालना/ लातूर/नांदेड/उस्मानाबाद व परभणी )
१५) जिल्हा कोषागार अधिकारी (औरंगाबाद/बीड/ हिंगोली/ जालना/ लातूर/नांदेड/उस्मानाबाद व परभणी )
१६) शालेय शिक्षण व क्रीडा विभागातील सर्व कार्यासने
१७) निवड नस्ती, एसएम-४.

शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्रमांक:-सादिल-२०२१/प्र.क्र.१०१/एसएम-४,

दिनांक:-९ सप्टेंबर,२०२१ सोबतचे विवरणपत्र

(रुपये लाखात)

| अ.क्र. | जिल्हा | पुनर्बांधणी करावयाच्या एकूण वर्ग खोल्या | | | मोठी दुरुस्ती करावयाच्या शाळांची संख्या | | एकूण |
|---|---|---|---|---|---|---|---|
| | | शाळा | वर्गखोल्या | रक्कम | शाळा | रक्कम | रक्कम |
| १ | औरंगाबाद | ८१ | १७३ | १५९१.६० | १३० | ३३८.१५ | १९२९.७५ |
| २ | बीड | २१७ | ३५२ | ३२९१.२० | १७२ | ४०४.१५० | ३६९५.३५ |
| ३ | हिंगोली | ४२ | १२६ | ११८५.६० | ७१ | ४३१.७० | १६१७.३० |
| ४ | जालना | १५६ | ३३२ | ३२८३.२० | १७७ | ५८२.९३ | ३८६६.१३ |
| ५ | लातूर | ३२ | ९५ | ९४४.४० | ४४ | ३४९.१९ | १२९३.५९ |
| ६ | नांदेड | १०५ | २६४ | २८४२.४० | २३२ | ६७५.९० | ३५१८.३० |
| ७ | उस्मानाबाद | २९ | ९६ | ९३६.०० | ८१ | ३१९.४५ | १२५५.४५ |
| ८ | परभणी | ५६ | १८५ | २०८९.२० | १४३ | ७३४.९३ | २८२४.१३ |
| | | **७१८** | **१६२३** | **१६१६३.६०** | **१०५०** | **३८३६.४०** | **२००००.००** |

(रुपये दोनशे कोटी फक्त)

Imtiyaz Mushtaque Kazi

Digitally signed by Imtiyaz Mushtaque Kazi
DN: CN = Imtiyaz Mushtaque Kazi, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = SCHOOL EDUCATION & SPORT DEPARTMENT
Date: 2021.09.09 13:37:40 +05'30'

**(इ. मु. काझी)**

**सह सचिव, महाराष्ट्र शासन**